**राष्ट्रीय छात्रसेना, गट मुख्यालय, मुंबई-ब येथील कार्यालयीन इमारतीची दुरुस्ती करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र:- राछासे-२६२१/प्र.क्र.६३/क्रीयुसे-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०५ ऑक्टोबर, २०२१.

वाचा:-

१) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.राछासे / इमारत व दुरुस्तीसाठी/२०२१-२२/का-५/५३९, दि. २५/०५/२०२१

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय, क्र.राछासे २६२१/प्र.क्र.६३/क्रीयुसे-३, दि. ०७/०९/२०२१

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय छात्रसेना, गट मुख्यालय, मुंबई-ब येथील कार्यालयीन इमारतीची दुरुस्ती सार्वजनिक बांधकाम विभागाकडून तातडीने करून घेणेबाबत रू. २७,३३,८२०/- ( अक्षरी रूपये सत्तावीस लक्ष तेहत्तीस हजार आठशे वीस फक्त) इतक्या किंमतीचे अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय छात्रसेना, गट मुख्यालय, मुंबई-ब येथील कार्यालयीन इमारतीच्या दुरुस्ती करीता रू. २७,३३,८२०/ (अक्षरी रूपये सत्तावीस लक्ष तेहत्तीस हजार आठशे वीस फक्त) इतक्या रकमेस **मागणी क्र- ई** ०४, ४२०२ , शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यांवरील भांडवली खर्च, ०१, सर्वसाधारण शिक्षण, २०२, माध्यमिक शिक्षण, ०० (०४) शिक्षण उप संचालक व शिक्षण विभागाच्या कार्यालय इमारतीचे बांधकाम ( ४२०२ ६२२८ ) ५३ मोठी बांधकामे या उद्दीष्टाखाली मंजूर केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीपैकी ६० टक्के प्रमाणे निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार सन २०२१-२२ च्या मंजूर तरतूदीमधून संदर्भ क्रमांक दोन येथील शासन निर्णयातील अटी व शर्तींच्या अधीन राहून निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदर इमारत दुरुस्तीवरील खर्च, **मागणी क्र- ई** ०४, ४२०२ , शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यांवरील भांडवली खर्च, ०१, सर्वसाधारण शिक्षण, २०२, माध्यमिक शिक्षण, ०० (०४) शिक्षण उप संचालक व शिक्षण विभागाच्या कार्यालय इमारतीचे बांधकाम (४२०२६२२८) ५३ मोठी बांधकामे या लेखाशिर्षातर्गंत सन २०२१-२२ च्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय, दि. २४.०६.२०२१ मधील सूचनांनुसार उपरोक्त निधी खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. तसेच, सदर काम पूर्ण झाल्यानंतर खर्च केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय, उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत यावर्षी मंजूर करण्यांत आलेल्या तरतुदीपेक्षा जास्त निधी खर्च होणार नाही या अटीच्या अधीन राहून, वित्त विभागाच्या संमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५४/२०२१/व्यय-५, दि. २२/०९/२०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११००५१७०५१०७६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2021.10.05 17:06:36 +05'30'

**( स्वा. म. नानल )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री, (क्रीडा व युवक कल्याण ) मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, (क्रीडा व युवक कल्याण ) मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
६. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
८. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्र सेना संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई. ( संचालनालयामार्फत )
९. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई
१०. निवडनस्ती (क्रीयुसे-३).